**शेतकरी मासिकासाठी तरतूद उपलब्ध करुन देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र.शेमायो-२०१०/प्र.क्र.१५९/११-अे
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २१ ऑगस्ट, २०१०**

**वाचा :** १) कृषि संचालक (वि. व प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शेमासे/लेखा/पु.मा./१९९/१०, दि.२१ एप्रिल, २०१०
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पुरक-२०.१०/प्र.क्र.१४९/अर्थसंकल्प-३, दि.३० जुलै, २०१०
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. पुरक-२०१०/(प्र.क्र.८५/१०)/२-अे, दि.०३ ऑगस्ट, २०१०

**प्रस्तावनाः**

शेतकरी मासिक सन १९६५ पासून कृषि विभागामार्फत सातत्याने प्रसिद्ध करण्यात येत आहे. या मासिकामध्ये शेतीविषयक नविन तंत्रज्ञान, संशोधन तसेच शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना इ.ची माहिती प्रसिद्ध केली जाते. दरवर्षी सुमारे १५ लाख अंक छापले जातात. शेतकरी मासिक हे ना नफा ना तोटा या तत्वावर चालविण्यात येते.

२. सन २०१०-११ च्या अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये शेतकरी मासिकासाठी जाहिरात व प्रसिद्धी या बाबीकरिता रु.५०.०० लाख इतकी तरतूद करण्यात आली आहे. मात्र सदर बाबीकरिता जादा तरतूदीची आवश्यकता असल्याने महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०१० मधील दुसऱ्या (पावसाळी) अधिवेशनात रु.७०.०० लाख इतक्या रकमेची पुरक मागणी सादर करण्यात आली होती. **पुरवणी विनियोजन विधेयकास मा.राज्यपालांनी संमती दिली असून ते महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.-२०) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि.२७ जुलै, २०१० यामध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे.** सदर तरतूद उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०१० मधील दुसऱ्या (पावसाळी) अधिवेशनात शेतकरी मासिकाकरिता खालील लेखाशीर्षाखाली पुरक मागणीद्वारे मंजूर केलेली रक्कम रु.७०.०० लाख सदर शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

"मागणी क्र.डी-३, २४०१-पीक संवर्धन,
१०९-विस्तार व प्रशिक्षण, (०१) (०२) शेतकरी मासिक, (२४०१ ०७४४),
२६-जाहिरात व प्रसिद्धी"

२. शासन असेही आदेश देत आहे की, सदर प्रयोजनार्थ आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. पुरक-२०.१०/प्र.क्र.१४९/अर्थसंकल्प-३, दि.३० जुलै, २०१० व कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पूरक-२०१०/(प्र.क्र.८५/१०)/२-अे, दि.०३ ऑगस्ट, २०१० च्या अधिन राहून व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्रमांक१७१/१०/व्यय-१, दि.२०.८.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**(कृ.मा.प.)**

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००८२११९०५३०००१ आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

**( ब. दि.उमाटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
कृषि संचालक (वि. व प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
कृषि उपसंचालक तथा संपादक, शेतकरी मासिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
निवासी लेखाधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
वित्त विभाग (व्यय-१/विनियम/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई-३२
कक्ष अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती-११अे.